नक्षलग्रस्त भागातील गडचिरोली, अहेरी व गोंदिया जिल्ह्यातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणी / पोलीस उप ठाणी / सशस्त्र दूरक्षेत्रे व कार्यालये येथे व अतिसंवेदनशील क्षेत्रात कार्यरत विविध शाखांचे पोलीस अधिकारी / कर्मचारी यांना अनुज्ञेय वेतनाच्या दीडपट दराने वेतन व महागाई भत्ता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एनएएक्स ०११४/प्र.क्र.२६/वि.शा.१ ब**
दुसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ मे, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स ०८०९/प्र.क्र.५००/वि.शा.१ ब, दिनांक ११ जानेवारी, २०१०.**
२) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स ०८०९/प्र.क्र.५००/वि.शा.१ ब, दिनांक ३ नोव्हेंबर, २००९.**
३) **शासन निर्णय क्रमांकः एपीओ २८०९/प्र.क्र.२९०/पोल-३, दिनांक ३१ डिसेंबर, २००९.**
४) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स १११०/प्र.क्र.४९९/वि.शा.१ ब, दिनांक १८ फेब्रुवारी, २०११.**
५) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स १११०/प्र.क्र.४९९/वि.शा.१ ब, दिनांक १३ मार्च, २०१२.**
६) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स १०१२/प्र.क्र.४०८/वि.शा.१ ब, दिनांक २२ मार्च, २०१३.**
७) **शासन निर्णय क्रमांकः एनएएक्स ०११४/प्र.क्र.२६/वि.शा.१ ब, दिनांक ३१ मे, २०१४.**

## शासन निर्णय-

नक्षलग्रस्त गडचिरोली, अहेरी (पोलीस जिल्हा) व गोंदिया जिल्ह्यातील अतिसंवेदनशील क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या पोलीस अधिकारी / कर्मचारी यांना अनुज्ञेय असलेल्या वेतनाच्या दीडपट दराने वेतन व महागाई भत्ता देण्यासंबंधाने शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

१) गडचिरोली व अहेरी जिल्ह्यातील अतिसंवेदनशील पोलीस ठाणी / पोलीस उपठाणी / सशस्त्र दुरक्षेत्रे व कार्यालयामध्ये कार्यरत असलेल्या अखिल भारतीय सेवेतील अधिकारी व राज्य सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांना अनुज्ञेय वेतनाच्या दीडपट दराने मूळ वेतन व महागाई भत्ता देण्यात यावा. त्याचप्रमाणे गोंदिया जिल्ह्यातील उद्देशिकेतील अनुक्रमांक (४) येथील दिनांक १८.०२.२०११ च्या शासन निर्णयाद्वारे निश्चित करण्यात आलेल्या पोलीस ठाणी / पोलीस उपठाणी / सशस्त्र दुरक्षेत्रे व कार्यालयामध्ये कार्यरत असलेल्या अखिल

भारतीय सेवेतील अधिकारी व राज्य सेवेतील अधिकारी / कर्मचारी यांना अनुज्ञेय असलेल्या मूळ वेतनाच्या दीडपट दराने वेतन व महागाई भत्ता देण्यात यावा. म्हणजेच राज्यातील पोलीस दलाच्या विविध शाखांचे अधिकारी / कर्मचारी अतिसंवेदनशील क्षेत्रात कार्यरत / तैनात असेपर्यंत त्यांना करावे लागणारे जोखमीचे काम विचारात घेता कार्यरत कालावधीसाठी मिळत असलेल्या अनुज्ञेय वेतनाच्या दीडपट दराने वेतन व महागाई भत्ता देण्यात यावा.

२) राज्य गुप्तवार्ता विभागाचे अधिकारी / कर्मचारी यांना एकस्तर पदोन्नतीचा लाभ ते राज्यात कोठेही कार्यरत असले तरी अनुज्ञेय आहे. तथापि गोंदिया व गडचिरोली या जिल्ह्यात काम करणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांच्या कामाचे स्वरुप अत्यंत जोखमीचे आहे. यास्तव या जिल्ह्यात अतिसंवेदनशील भागात कार्यरत असलेल्या राज्य गुप्तवार्ता विभागाच्या अधिकारी / कर्मचारी यांना प्रोत्साहन मिळण्याच्या दृष्टीने एकस्तर पदोन्नतीचा लाभ किंवा अतिसंवेदनशील पोलीस ठाणी / पोलीस उप ठाणी / सशस्त्र दूरक्षेत्र येथे कार्यरत अधिकारी / कर्मचाऱ्यांप्रमाणे अनुज्ञेय वेतनाच्या दीडपट दराने वेतन अधिक महागाई भत्ता यापैकी जे जास्त असेल ते देण्यात यावे.

३) राज्य राखीव पोलीस दलाच्या तुकड्या गडचिरोली, अहेरी / गोंदिया जिल्ह्यातील अतिसंवेदनशील क्षेत्रात कार्यरत आहेत. यास्तव अतिसंवेदनशील क्षेत्रात जे कार्यरत असताना त्यांनाही अनुज्ञेय वेतनाच्या दीडपट दराने मूळ वेतन अधिक महागाई भत्ता देण्यात यावा. राज्य राखीव पोलीस बलातील अधिकारी / कर्मचारी उक्त संवेदनशील भागात कार्यरत असतील तोवरच त्यांना दीडपट दराने अनुज्ञेय वेतन व महागाई भत्ता लागू राहील.

४) नक्षलग्रस्त भागात कार्यरत संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना सामान्य प्रशासन विभागाकडून नक्षलग्रस्त भागात कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांना लागू केलेल्या इतर आर्थिक सवलती अनुज्ञेय असणार नाहीत. सदरची बाब संबंधित अधिकाऱ्यांनी विचारात घेऊन त्याप्रमाणे वेतन अदा करावे.

५) याबाबत येणाऱ्या वेतन व महागाई भत्त्यावरील अधिकचा खर्च या कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात येतात, त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व तो मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

६) हे आदेश दिनांक ०१ जानेवारी, २०१५ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ या कालावधीच्या वेतनभत्त्यासाठी लागू राहतील.

सदरचे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२८/१५/व्यय-७, दिनांक २७.०५.२०१५ नुसार दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०५२८११३६५७१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jaikumar Sovitkar

Digitally signed by Sunil Jaikumar Sovitkar
DN: CN = Sunil Jaikumar Sovitkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.05.28 12:32:56 +05'30'

**( सु.ज.सोवितकर )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई.
६. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, नागपुर / पुणे.
९. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, गडचिरोली.
१०. जिल्हाधिकारी, गडचिरोली / गोंदिया.
११. पोलीस अधिक्षक, गडचिरोली / अहेरी / गोंदिया.
१२. सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल.
१३. मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामिण / शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
१५. गृह विभागातील सर्व अधिकारी.
१६. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर.

१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. सर्व मंत्रालयीन विभाग.

२१. निवडनस्ती (वि.शा.१ ब)